**सह संचालक, नगर रचना (गट-अ / राजपत्रित)**
**<u>पदावर पदोन्नती व पदस्थापना देण्याबाबत...</u>**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग,**
**शासन निर्णय क्र.पदोन्न-१३१६/६०/प्र.क्र.२५/नवि-२७,**
चौथा मजला, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
**दिनांक :- ०४ जानेवारी, २०१७.**

<u>वाचा</u> :- १. संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे दि.१२.०१.२०१६ चे पत्र.
३. नगर विकास विभाग, शासन पत्र क्र.पदोन्न-१३१६/६०/प्र.क्र.२५/नवि-२७, दि.२३.०५.२०१६.
२. सामान्य प्रशासन विभाग यांचे पत्र क्र.ईएसबी-१११६/प्र.क्र.९१/१३, दि.०५.०७.२०१६.

**<u>प्रस्तावना</u> :-**

सह संचालक, नगर रचना (गट-अ / राजपत्रित) (वेतनसंरचना पीबी-४, रु.३७,४००-रु.६७,०००+ग्रेड पे रु.८,७००/-) संवर्गातील रिक्त पदे उप संचालक, नगर रचना (गट-अ / राजपत्रित) (वेतनसंरचना पीबी-३, रु.१५,६००-रु.३९,१००+ग्रेड पे रु.७,६००/-) या निम्न संवर्गातील अधिकाऱ्यांमधून पदोन्नतीने भरण्याचा प्रस्ताव आस्थापना मंडळ क्र.२ पुढे सादर करण्याकरिता सामान्य प्रशासन विभागास विनंती करण्यात आली होती. त्यानुषंगाने आस्थापना मंडळ क्र.२ यांनी दि.२०.०६.२०१६ रोजीच्या बैठकीतील निर्णयानुसार उप संचालक, नगर रचना (गट-अ / राजपत्रित) या निम्न संवर्गातील अधिकाऱ्यांमधून सह संचालक, नगर रचना (गट-अ / राजपत्रित) या संवर्गातील रिक्त पदे पदोन्नतीने भरण्याबाबत शिफारसी केल्या आहेत. यास्तव उप संचालक, नगर रचना संवर्गातील पात्र अधिकाऱ्यांना सह संचालक, नगर रचना पदावर पदोन्नतीने पदस्थापना देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. आता याबाबत शासन पुढीलप्रमाणे आदेश देत आहे :-

**शासन निर्णय :-**

आस्थापना मंडळ क्र.२ यांनी शिफारस केल्यानुसार उप संचालक, नगर रचना (गट-अ / राजपत्रित) संवर्गातील खालील अधिकाऱ्यांना आदेशाच्या दिनांकापासून सह संचालक, नगर रचना (गट-अ / राजपत्रित) (वेतनसंरचना पीबी-४, रु.३७,४००-रु.६७,०००+ग्रेड पे रु.८,७००/-) पदावर **<u>तदर्थ</u>** पदोन्नती देण्यात येऊन त्यांची खालील विवरणपत्रात दर्शविण्यात आल्यानुसार पदोन्नतीने पदस्थापना करण्यात येत आहे.

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नांव व प्रवर्ग | पदोन्नतीचा प्रवर्ग | सध्याचे कार्यालय | पदोन्नतीने पदस्थापनेचे कार्यालय |
|---|---|---|---|---|
| १ | श्रीमती प्रतिभा उमेश भदाणे (इमाव) | खुला | उप संचालक,नगर रचना, नागरी संशोधन घटक, मुख्यालय, पुणे. | सह संचालक, नगर रचना, नाशिक विभाग, नाशिक. (रिक्त पदी) |
| २ | श्री. नरेशचंद्र रामचंद्र कावळे (अजा) | अजा | उप संचालक, नगर रचना, मूल्यांकन, मुंबई. | सह संचालक, नगर रचना, औरंगाबाद विभाग, औरंगाबाद (रिक्त पदी) |

**०२.** उपरोक्त दर्शविल्याप्रमाणे श्रीमती प्र. उ. भदाणे, उप संचालक, नगर रचना व श्री. न. र. कावळे, उप संचालक, नगर रचना यांना सह संचालक, नगर रचना पदावर देण्यात आलेली **तदर्थ** पदोन्नती ही सामान्य प्रशासन विभागाने दि.०५.०७.२०१६ च्या पत्रान्वये निश्चित केलेल्या खालील अटी व शर्तींच्या अधीन राहील.

**अ.** सामान्य प्रशासन विभाग, दि.०२.०४.१९७६ मधील तरतूदीनुसार श्रीमती प्र. उ. भदाणे, उप संचालक, नगर रचना व श्री. न. र. कावळे, उप संचालक, नगर रचना यांच्याविरुद्ध सद्य:स्थितीत कोणतीही विभागीय चौकशी अथवा न्यायालयीन कारवाई प्रलंबित अथवा प्रस्तावित नाही.

**ब.** पदोन्नतीचे पद महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या कक्षेतील असल्याने नियमित निवडसूचीवरील पात्रापात्रतेनंतर आणि सदर निवडसूचीस महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या मान्यतेने नियमित केल्यानंतर उक्त अधिकारी हे पदोन्नतीच्या पदावर सेवाज्येष्ठता व अन्य सेवाविषयक लाभ मिळण्यास पात्र ठरतील.

**क.** विभागाने आस्थापना मंडळ क्र. २ यांना सादर केलेल्या ज्येष्ठतासूचीनुसार विचारक्षेत्रातील अधिकाऱ्यांची पात्र / अपात्रता तपासण्यात आली असून यासंदर्भात कोणतेही प्रकरण भविष्यात उद्भवल्यास याबाबत सामान्य प्रशासन विभागाच्या सहमतीने यथायोग्य निर्णय घेण्यात येईल.

**ड.** उक्त अधिकाऱ्यांच्या जात वैधतेबाबत संबंधित विभाग / कार्यालय (सामाजिक न्याय किंवा आदिवासी विकास विभाग / संबंधित जात पडताळणी कार्यालय) यांच्याकडून खातरजमा करण्यात आली आहे.

**इ.** उक्त अधिकाऱ्यांची पदोन्नती **तदर्थ** व मा. उच्च न्यायालय, मुंबई यांच्या समोरील रिट याचिका क्र.२७९७/२०१५ (स्टॅम्प क्र.७२५६/२०१५) (महाराष्ट्र राज्य विरुध्द श्री. विजय घोगरे व इतर) तसेच संलग्न इतर न्यायालयीन प्रकरणामध्ये होणाऱ्या अंतिम निर्णयाच्या अधीन राहील.

**०३.** उपरोक्त नमूद अटींशिवाय उक्त अधिकाऱ्यांची तदर्थ पदोन्नती त्यांच्या वयाच्या ५०/५५ वर्षाच्या पुढे किंवा अर्हताकारी ३० वर्षाच्या सेवा कालावधीपुढे सेवेत राहण्यास पात्रापात्रता अजमाविण्याच्या निर्णयाच्या अधीन राहील.

**०४.** सदर तदर्थ पदोन्नतीबाबत वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.वेतन-१०८५/सीआर-७९९/८५/सेवा, दि.०५ डिसेंबर, १९८५ व वित्त विभाग, शासन शुद्धीपत्रक क्र.वेतन-१०८६/सीआर-१५१/सेवा-३, दि.२४

फेब्रुवारी, १९८६ मधील तरतूदीनुसार वेतननिश्चितीकरिता विकल्पाची तरतूद नसल्याने या आदेशान्वये तदर्थ पदोन्नती देण्यात येत असलेल्या अधिकाऱ्यांची वेतननिश्चिती महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियम, १९८१ मधील नियम ११ (१) (ए) नुसार / महाराष्ट्र नागरी सेवा (सुधारित वेतन) नियम, २००९ मधील नियम १३ (अ) (१) (२) ब (१ व २) नुसार पदोन्नतीचा दिनांक विचारात घेऊन करण्यात यावी.

**०५.** सदरहू आदेशान्वये पदोन्नतीने पदस्थापना देण्यात आलेल्या अधिकाऱ्यांना पदस्थापनेच्या ठिकाणी रुजू होण्याकरिता संचालक, नगर रचना, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी तात्काळ कार्यमुक्त करावे. संचालक, नगर रचना, पुणे यांचे कार्यकारी आदेश प्राप्त होताच पदोन्नत अधिकाऱ्यांनी पदस्थापनेच्या ठिकाणी तात्काळ रुजू व्हावे. या आदेशान्वये पदोन्नती देण्यात येत असलेले अधिकारी पदोन्नतीच्या पदावर ज्या दिनांकास रुजू होतील, त्या दिनांकापासून ते पदोन्नत झाले आहेत, असे समजण्यात येईल.

**०६.** पदोन्नत अधिकाऱ्यांनी पदस्थापनेच्या ठिकाणी विहित वेळेत हजर न झाल्यास किंवा राजकीय दबाव आणून पदस्थापना बदलण्याचा प्रयत्न केल्यास, संबंधित अधिकाऱ्याच्या गोपनीय अहवालात त्यानुसार नोंद घेण्यात येईल. तसेच राजकीय दबावाची कृती ही महाराष्ट्र नागरी सेवा (शिस्त व अपील) नियम, १९७९ मधील नियम ३ (३) व २३ चा भंग करणारी असल्यामुळे संबंधित अधिकाऱ्याविरुद्ध उक्त नियमाखाली शिस्तभंग विषयक कारवाई करण्यात येईल याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

**०७.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक संकेताक क्रमांक २०१७०१०४१६४८१७६५२५ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Samadhan Khatkale

Digitally signed by Samadhan Khatkale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=3cc48a0aa3fbc01f7ee956a75c9445a5b81fec5e429c69234939d35b4eaceee0, cn=Samadhan Khatkale
Date: 2017.02.03 12:27:35 +05'30'

**(समाधान खटकाळे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत :-**

१. श्रीमती प्र. उ. भदाणे, उप संचालक, नगर रचना नागरी संशोधन घटक, मुख्य कार्यालय, पुणे.
२. श्री. न. रा. कावळे, उप संचालक, नगर रचना, मूल्यांकन, मुंबई.

} संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचेमार्फत.

**प्रत माहिती व आवश्यक त्या कार्यवाहीस्तव :-**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई / महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर.
२. महालेखापाल (लेखा परिक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई / महालेखापाल (लेखा परिक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर.

३. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई / नागपूर.
४. प्रधान सचिव, मुख्य मंत्री, सचिवालय, मंत्रालय, मुंबई.
५. प्रधान सचिव (महसूल), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, नवीन प्रशाकीय इमारत, विधानभवनासमोर, पुणे.
७. संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे. **(३-प्रती)**
८. सह सचिव व संचालक, नगर रचना, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. सर्व सह संचालक, नगर रचना,
१०. उप सचिव (१६-ब), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. उप सचिव (का.१३), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. कार्यासन अधिकारी (नवि-३ / नवि-५ / नवि-८), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. मा. राज्यमंत्री, नगर विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
१४. प्रधान सचिव (नवि-१) यांचे स्वीय सहायक, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५. सचिव (नवि-२) यांचे स्वीय सहायक, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
१७. निवडनस्ती / (नवि-२७).

****